**केंद्र शासनाच्या कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान - व्यापारी पिके (कापूस, ऊस) अंतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी निधी वितरीत करण्याबाबत.**

**कापूस - (केंद्र हिस्सा - २४०१ A५७५)**
**(राज्य हिस्सा - २४०१ A ५८४)**
**ऊस - (केंद्र हिस्सा - २४०१ A५९३)**
**(राज्य हिस्सा - २४०१ A ६०१)**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र.७/कार्यासन ६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : - २३ फेब्रुवारी, २०२२.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शा. नि. क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र. ४८/अर्थ-३, दि.६.०४.२०२१, दि.१४.१०.२०२१.

२) कृषी व पदुम विभागाची नस्ती क्र.राअसु-२०२०/प्र.क्र.०५/४-अे.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कृषी व पदुम विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय सुरक्षा अभियानांतर्गत व्यापारी पिकांसाठी सन २०२१-२२ या वर्षाकरीता प्रथम हप्त्यासाठी प्राप्त झालेला केंद्र हिस्सा रु.९.८६ लाख (कापूस - रु.६.२३ व ऊस-रु.३.६३ लाख) व समरुप राज्य हिस्सा रु.६.५७ लाख (कापूस-रु.४.१५ लाख व व ऊस-२.४२ लाख) असा एकूण रु.१६.४३ लाख इतका निधी सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पित तरतुदींतून वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत कृषी व पदुम विभागाकडून संदर्भाधीन क्र.३ अन्वये सादर करण्यात आलेल्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ याखाली मुख्य लेखाशीर्ष २४०१-कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय सुरक्षा अभियानांतर्गत व्यापारी पिकांकरीता (कापूस व ऊस) सन २०२१-२२ या वर्षाकरीता **प्रथम हप्त्यासाठी प्राप्त झालेला केंद्र हिस्सा रु.९.८६ लाख** (कापूस - रु.६.२३ व ऊस-रु.३.६३ लाख) व **समरुप राज्य हिस्सा रु.६.५७ लाख** (कापूस-रु.४.१५ लाख व व ऊस-२.४२ लाख) असा **एकूण रु.१६.४३ लाख** इतका निधी सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पित तरतुदींमधून वितरीत व खर्च करण्यास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.लाखात)**

| योजनेचे नाव | व्यापारी पिके | लेखाशिर्ष व केंद्र/राज्य हिस्सा | बाब | सन २०२०-२१ मधील अर्थसंकल्पित तरतूद | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय सुरक्षा अभियान **व्यापारी पिके (कापूस व ऊस)** | कापूस | २४०१ A ५७५ केंद्र हिस्सा | ३३, अर्थसहाय्य | २४.०० | ६.२३ |
| | | २४०१ A ५८४ राज्य हिस्सा | | १६.०० | ४.१५ |
| | ऊस | २४०१ A ५९३ केंद्र हिस्सा | | २८.०० | ३.६३ |
| | | २४०१ A ६०१ राज्य हिस्सा | | १८.०० | २.४२ |
| | **एकूण** | | | **८६.००** | **१६.४३** |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.१६.४३ लाख** (अक्षरी रुपये सोळा लाख त्रेचाळीस हजार फक्त) इतका निधी प्रशासकीय प्रमुख म्हणून सचिव, कृषी विभाग यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. सदर निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. प्रकरणी विभागप्रमुख / नियंत्रण अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी व निधी उपयोगिता प्रमाणपत्रासह पुढील निधी वितरणासाठी प्रस्ताव सादर करावा.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी सदरचा खर्च आदिवासी उपयोजना क्षेत्रातच नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतून आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात तथापि, आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रात मात्र वैयक्तिक लाभाच्याच योजना घेण्यात याव्यात.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा क्र.१ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२१७११२२३८०२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.02.23 14:59:19 +05'30'

**(रविंद्र दि. औटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, कृषी विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
५. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११.निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.